**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत (लेखाशिर्ष २२१५-९७९१)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१९/ प्र.क्र.१४३/ पापु-१०**
जी.टी. हॉस्पीटल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
तारीख: २४ डिसेंबर,२०१९

वाचा -

१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ)/ पापु-०७, दि.१७.०३.२०१०
२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/ पापु-०७, दि.०९.०७.२०१४
३) वित विभाग,शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.०८.०७.२०१९

प्रस्तावना -

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरुस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदाना संदर्भात आर्थिक वर्ष २०१९-२० मध्ये मागणी क्र. मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा ) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या निधीपैकी अंमलबजावणी यंत्रणांना रू. २०.६०कोटी (वीस कोटी साठ लाख फक्त )निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

## शासन निर्णय-

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणाऱ्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीकरिता सोबत जोडण्यात आलेल्या तक्त्यातील जिल्हा परिषदांना एकूण रू. २०.६० कोटी (रु. वीस कोटी साठ लाख फक्त )इतके अनुदान कव्हरेज या घटकासाठी अर्थसंकल्प प्रणालीव्दारे (BEAMS) पुढीलप्रमाणे अटींच्या अधिन राहून मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

१) अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निश्चित वार्षिक कृती आराखड्यात समाविष्ट असलेल्या कव्हरेज गावे/ वाडयांमधील प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या गावे/ वाडयांमधील योजनांची कामे तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे. अशा प्रगतीपथावरील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करावयाचे आहे .

२) सदर निधी सन २०१९-२० या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे. याची कृपया दक्षता घेण्यात यावी.

३) अंमलबजावणी यंत्रणानी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

४) या शासन निर्णयातील अटी व शर्ती राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून पूर्तता होत आहे याची शासनाला खात्री करून घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर यांनी तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरिता अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखा पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संपुर्ण मदत व सुविधा पुरवतील.

५) जिल्हा परिषद यांनी सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकास कार्यासन पापु-१०/ पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,

मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई/ नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

६) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज या खाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च ५० टक्के केंद्र निधीतून व ५० टक्के राज्य निधीतून करणे आवश्यक आहे.

७) केंद्र व राज्य हिस्स्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता IMIS प्रणालीवर घेण्याकरिता Nodal Officer नियुक्त करण्यात यावा. IMIS प्रणालीवर माहिती अद्ययावत न झाल्यास संबंधित Nodal Officer वर जबाबदारी निश्चित करण्यात यावी.

८) सदर निधी कृती आराखड्यात समाविष्ट असलेल्या गावांच्या प्रगतीपथावरील योजनांसाठीच खर्च करावा. तसेच उपलब्ध करून देण्यात आलेला निधी उपयोगात आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून खर्चाचे नियोजन करावे.

९) उपरोक्त निधी संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग दि.०८.०७.२०१९ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच उक्त परिपत्रकान्वये आवश्यक असलेली प्रमाणपत्रे या विभागास सादर करण्यात यावीत.

२. सदर निधीतून करण्यात आलेल्या खर्चाची नोंद केंद्र शासनाच्या IMIS प्रणालीवर घेऊन ती वेळोवेळी अद्यावत करण्यात यावी. तसेच BDS प्रणालीवर मुक्त केलेली रक्कम जिल्हा परिषद यांनी त्वरीत संबंधित कोषागारातून काढण्याची कार्यवाही करावी. कोषागारातून रक्कम वेळीच न काढली गेल्यास तसेच सदर रक्कम या शासन निर्णयात नमूद केलेल्या प्रयोजनांसाठी न वापरण्यात आल्यास त्याबाबतची संपुर्ण जबाबदारी संबंधितांची राहील.

३. यावर होणारा खर्च क्र. क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर प्रकरणी वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकामधील तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १ ते ९ व क्र.९ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२२३१७१२४६१७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2019.12.24 10:59:58 +05'30'

**( वसंत माने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
२. महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१-मुंबई/२-नागपुर,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ नागपूर
४. नियोजन विभाग(कार्यासन १४४३)/ वित्त विभाग(व्यय-३), मंत्रालय, मुंबई,
५. विभागीय आयुक्त, सर्व,
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७. संचालक ( वित्त ) ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, धुळे /लातूर

९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर

१०. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, धुळे/ लातूर

११. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, धुळे/ लातूर

१२. जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे /लातूर

१३. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,

१४. पापु-०४/२०/२३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,

१५. निवडनस्ती पापु-१०.

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिस्स्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत (लेखाशिर्ष २२१५-९७९१) शा. नि. क्र. राग्रापे-२०१९/ प्र.क्र.१४३/ पापु-१०, दि.२४.१२.२०१९ चे विवरणपत्र -

( रु.कोटीत)

| अ.क्र | जिल्हा परिषद | केद्र हिस्सा |
|---|---|---|
| १ | धुळे | रू.८.३० |
| २ | लातूर | रु.७.३० |
| ३ | सांगली | रु.५.०० |
| | एकूण | रु.२० ६० |

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2019.12.24 11:00:41 +05'30'

**( वसंत माने )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन